इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील (कनिष्ठ महाविद्यालय) मान्यताप्राप्त कर्मचाऱ्यांचे ऑनलाईन वेतन अदा करणेसाठी कालमर्यादा निश्चितकरणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. विभशा-२०२०/प्र.क्र.२५१/विजाभज-२**

१ ला मजला, विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २० ऑगस्ट, २०२०.

**संदर्भ :-** शासन निर्णय समक्रमांक दि.१३ मार्च, २०२०

**प्रस्तावना:-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अखत्यारीतील कार्यरत असलेल्या १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळेपैकी शासन निर्णय दि.८/३/२०१९ अन्वये ९४ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना तसेच शासन निर्णय दि.१७/९/२०१९ अन्वये ४७ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वित्त विभागाच्या मान्यतेने निकषपात्र ठरविण्यात आलेले आहे. तसेच त्यातील कर्मचाऱ्यांना ऑनलाईन वेतन अदा करावे असेही वित्त विभागाने आदेशित केले आहे.

२. विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये निर्माण करावयाच्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या पदांबाबत दि.२६/६/२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सूचना दिलेल्या आहेत.

३. मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठात दाखल याचिका क्र.५९९१/२०१६ मध्ये मा.न्यायालयालये दि.११/१०/२०१८ रोजीच्या निर्णयानुसार विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांचे सद्यस्थितीत ऑफलाईन वेतन अदा करण्यात येत आहे. यापुढे कर्मचाऱ्यांचे वेतन थेट त्यांच्या बँक खात्यामध्ये ऑनलाईन पध्दतीने अदा करावे असे मा.न्यायालयाने आदेशीत केलेले आहे. सदर कार्यवाही अद्यापही झाली नसल्याने काही कर्मचाऱ्यांनी मा.न्यायालयात अवमान याचिका देखील दाखल केलेल्या आहेत.

४. सद्यस्थितीत विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांचे नियमित वेतन ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यात येत असून उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांचे वेतन ऑनलाईन पध्दतीने करण्याबाबत कालमर्यादेत कार्यवाही करण्याबाबत वित्त विभागाने सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार संदर्भाधीन शासन निर्णयान्वये इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील (कनिष्ठ महाविद्यालय) मान्यताप्राप्त कर्मचाऱ्यांचे ऑनलाईन वेतन अदा करणेबाबत निर्देश देण्यात आलेले होते. परंतु ऑनलाईन वेतन अदा करण्याबाबत कालमर्यादा सदरहू शासन निर्णयामध्ये निश्चित नसल्यामुळे ऑनलाईन वेतन अदा करण्याबाबत विहित कालमर्यादा निश्चित करणे शासनाच्या विराधीन होती.

५. तसेच, संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये क्षेत्रीय कार्यालयांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची तपासणी करुन डी.डी.ओ.कोड घेण्याबाबत निर्णय घेण्यासाठी श्री. भा.र.गावित, सहसचिव इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आलेली होती. परंतु श्री. भा.र.गावित, सह सचिव यांची बदली अन्य विभागामध्ये झालेली असल्यामुळे सदरहू समिती पुर्नगठीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबी विचारात घेता शासन निर्णय दि.८/३/२०१९ व दि.१७/९/२०१९ सोबतच्या यादीमधील उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांची नांवे सेवार्थ प्रणालीत समाविष्ठ करुन त्यांचे ऑनलाईन वेतन अदा करण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये कार्यवाही करण्यात यावी.

शासन निर्णय दि.८/३/२०१९ व दि.१७/९/२०१९ सोबतच्या यादीमधील उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांना माहे मार्च २०२१ पर्यंतच ऑफलाईन वेतन अदा करण्यास मुभा असेल. माहे मार्च २०२१ नंतर ज्या कर्मचाऱ्याची वेतन सेवार्थ प्रणालीद्वारे ऑनलाईन अदा करण्यात येत नाही त्यांना ऑफलाईन पध्दतीने वेतन अदा करता येणार नाही.

तसेच, संदर्भाधीन शासन निर्णयान्वये क्षेत्रीय कार्यालयांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची तपासणी करुन डी.डी.ओ. कोड घेण्याबाबत निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे समिती पुर्नगठीत करण्यात येत आहे. सदर समिती प्राप्त प्रस्तावांची तपासणी मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांना अहवाल सादर करतील.

| अ.क्र. | अधिकारी / कर्मचारी | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | उप सचिव (श्री. प्रकाश वळवी), इतर मागास बहुजन कल्याण विभाग | अध्यक्ष |
| २. | विधी अधिकारी (कंत्राटी) श्री. प्रभाकर परदेशी) इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य |
| ३. | कक्ष अधिकारी (विजाभज-२) (श्री. मं.हिं. बनसोडे) इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य |
| ४. | कक्ष अधिकारी (आस्थापना) (श्री. कि.आ. फुलझेले) इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य |
| ५. | सहाय्यक कक्ष अधिकारी (विजाभज-२) (श्री. प्रितम चौगुले) इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य सचिव |

तसेच, संदर्भाधीन दि. १३ मार्च, २०२० च्या शासन निर्णयातील नमूद अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००८२०१५५५०८०७२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Prakash Nathlya Valvi
Date: 2020.08.20 16:01:53 +05'30'

**( प्रकाश वळवी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
५. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
६. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्र.सचिव, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण विभाग
८. संचालक, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग (सर्व)
१०.सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण (सर्व)
११.जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२.निवड नस्ती (विजाभज-२).